**सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब/ राजपत्रित) पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती व पदस्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- नियुक्ती-११२०/प्र.क्र.०२/२०२०/नवि-२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १७ फेब्रुवारी, २०२०

वाचा : १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग जाहिरात क्र.२०/२०१८.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक-११८३(१)/११७१०/पंधरा, दि.२०.०९.२०१९.
३) संचालक, नगर रचना, पुणे यांचे पत्र जा.क्र. जा.क्र.आस्था/मलोसेआ/सनर-सरळसेवा/ प्रशा-१७/५६७९, दि.१९.११.२०१९.
४) शासन निर्णय समक्रमांक दि.१८.०१.२०२०.

**प्रस्तावना :-**

नगर रचना आणि मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब/राजपत्रित) या संवर्गातील रिक्त पदे नामनिर्देशनाने भरण्याकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने जा.क्र.२०/२०१८, दि.०९.०३.२०१८ अन्वये दिलेल्या जाहिरातीच्या अनुषंगाने विहित प्रक्रियेअंती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि.२०.०९.२०१९ च्या पत्रान्वये एकूण १७२ उमेदवारांची गुणवत्तेच्या आधारे मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट याचिका क्र.८४४४/२०१९ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून नियुक्तीसाठी शासनास शिफारस केलेली आहे.

त्यानुसार १६५ उमेदवारांना शासन सेवेत नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयातील सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब)(राजपत्रित) (वेतनबँड रु. ९३००-३४८००, ग्रेड वेतन रु.४४००/-) (सातव्या वेतन आयोगानुसार वेतन संरचना एस-१५ : ४१८००-१३२३००) या पदावर दि.१८.०१.२०२० च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती व पदस्थापना देण्यात आली आहे. शिफारस केलेल्या १७२ उमेदवारांपैकी आदेश निर्गमित न केलेल्या ४ उमेदवारांना नियुक्ती व पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे. :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची शिफारस तसेच त्यानुषंगाने संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त करुन घेण्यात आलेला अहवाल विचारात घेऊन, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयातील सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब)(राजपत्रित) (वेतनबँड रु. ९३००-३४८००, ग्रेड वेतन रु.४४००/-) (सातव्या वेतन आयोगानुसार वेतन संरचना एस-१५ : ४१८००-१३२३००) या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांना मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट याचिका क्र.८४४४/२०१९ व रिट याचिका क्र.२७२५१/२०१९ च्या अंतिम निकालाच्या अधीन या आदेशाद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून सरळसेवेने नियुक्ती देण्यात येत आहे. सदर उमेदवारांची सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब)(राजपत्रित) या पदावर खालील तक्त्यामध्ये त्यांच्या नांवासमोर दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | वाटप केलेला महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ४७ | श्री.प्रशांत शिवाजी डोंगरे | पुणे | औरंगाबाद महसुली विभागात **सहायक संचालक, नगर रचना, बीड** या कार्यालयात. |
| २ | ५४ | श्री.रोहन रामचंद्र साळुंके | पुणे | कोकण-२ महसुली विभागा **नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई** या कार्यालयात. |
| ३ | १०० | श्रीमती ऐश्वर्या तुकाराम शेंडगे | औरंगाबाद | पुणे महसुली विभागात **सहायक संचालक, नगर रचना, पुणे** या कार्यालयात. |
| ४ | १४३ | श्री.रविराज दशरथ पेखळे | औरंगाबाद | पुणे महसुली विभागात **संचालक, नगर रचना, पुणे** या कार्यालयात. |

**०२.** सदरहू उमेदवारांची सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब) (राजपत्रित) या पदावरील नियुक्ती खालील अटी/ शर्तींच्या अधीन राहील.

**अटी व शर्ती:-**

i. सदर उमेदवारांची सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ या पदावरील नियुक्ती प्रथम २ वर्षाच्या परिविक्षाधिन कालावधीसाठी राहील.

ii. सदर उमेदवारांची सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ या पदावरील नियुक्ती उमेदवारांना मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट याचिका क्र.८४४४/२०१९ व रिट याचिका क्र.२७२५१/२०१९ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

iii. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी.६७/प्र.क्र.२०७/ कार्या.१२, दि.२८ मे, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार व महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ च्या नियम ४(२)(अ) मधील तरतूदीनुसार उक्त उमेदवारांनी सदर नियुक्ती, या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत स्विकारणे बंधनकारक राहील. सदर विहित कालावधीत ते रुजू झाले नाहीत तर ते नोकरीची संधी गमावतील व त्यांचा नियुक्तीकरिता विचार करण्यात येणार नाही. यासाठी संबंधित उमेदवाराकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/ विनंतीचा विचार केला जाणार नाही.

iv. सदर उमेदवारांची पदस्थापना वैद्यकीय तपासणी व पोलीस अहवालाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

v. सदर उमेदवारांनी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/ २००१/३९, दि.१९.०३.२००३ मधील तरतुदीनुसार संगणक हाताळणी वापराबाबतचे आवश्यक प्रमाणपत्र सादर केले नसल्यास एका महिन्याच्या कालावधीत संचालक, नगर रचना, महाराष्ट्र पुणे यांच्याकडे सादर करावे.

vi. सदर उमेदवारांची नियुक्ती ही सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले वैध जात प्रमाणपत्र, गोपनीय अहवाल, संगणक हाताळणीबाबत / वापराबाबतचे आवश्यक ते प्रमाणपत्र, विहीत साक्षांकन नमुन्यातील माहिती व शैक्षणिक अर्हता, प्रगत व उन्नत गटात मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र (लागू असल्यास), लहान कुटुंबाचे प्रमाणपत्र इ. आवश्यक प्रमाणपत्रांची सत्यासत्यता तपासण्याच्या तसेच संबंधित उमेदवार सदर पदावरील नियुक्तीच्या पात्रतेच्या विहित अटींची पूर्तता करतात ही बाब तपासण्याच्या अधिनतेने राहील.

vii. सदर उमेदवार हे सदर पदावरील नियुक्तीच्या पात्रतेच्या विहित अटींची पूर्तता करतात याबाबतची पडताळणी तसेच संबंधित उमेदवारांच्या जात प्रमाणपत्र, जात पडताळणी प्रमाणपत्र व शैक्षणिक प्रमाणपत्रांची विहित प्राधिकरणांकडून तपासणी करण्याबाबतची आवश्यक कार्यवाही संचालक, नगर रचना, पुणे यांनी करावी.

viii. गुणवत्ता यादीतील अ.क्र.१४३, श्री. रविराज दशरथ पेखळे या उमेदवारांची निवड खेळाडूंसाठी राखीव असलेल्या पदावर झाली आहे. सदरहू उमेदवाराची नियुक्ती संबंधित प्राधिकरणांकडून प्रमाणपत्रे प्रमाणित होण्याच्या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे. सदर प्रमाणपत्रे अवैध ठरल्यास त्यांची सेवा तात्काळ समाप्त करण्यात येईल.

**०३.** सदर उमेदवारांची ज्येष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गुणानुक्रमानुसार राहिल.

**०४.** संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर उमेदवारांपैकी त्यांच्या अधिनस्त असलेल्या अधिकाऱ्यांना नवीन पदावर रुजू होण्यासाठी ते सध्या धारण करीत असलेल्या पदावरुन कार्यमुक्त करण्याबाबतचे व नवीन पदाचा कार्यभार स्विकारण्याबाबतचे कार्यकारी आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

**०५.** संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर उमेदवार रुजू झाल्यानंतर उक्त पदाचा कार्यभार स्विकारण्याबाबतचे कार्यकारी आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक क्रमांक २०२००२१७१५३२०६११२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vishnu Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09, serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2020.02.17 18:03:33 +05'30'

**( विष्णू पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति :-**

**सर्व संबंधित अधिकारी** यांना संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.

**प्रत :-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (पत्राने).
५) मा.मंत्री, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.

६) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
७) मा.अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग (१) यांचे स्वीय सहायक.
८) मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक.
९) विभागीय आयुक्त, पुणे/औरंगाबाद
१०) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) जिल्हाधिकारी, पुणे / बीड.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३) सह संचालक, नगर रचना ----------------
१४) उप संचालक, नगर रचना ------------------
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, -------------------
१६) निवडनस्ती/नवि-२७.

***